महाराष्ट्र भूषण पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. मभूपु १२२० (१३)/प्र. क्र. १५९/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ ऑक्टोबर, २०२०

संदर्भ: १) शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. मभुपु १०९५/१३८७७/प्र.क्र.१०१/कार्या.१, दिनांक १९ ऑगस्ट, १९९५
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. मभुपू २०१२/सुनिठ/ प्र.क्र.१४३/सां.का.४, दिनांक १ सप्टेंबर, २०१२
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. मभुपू १२१४ (११)/ प्र.क्र.२०३/सां.का.४, दिनांक ७ एप्रिल, २०१५
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण ८२२०/ प्र.क्र.१५/सां.का.४, दिनांक १८ जानेवारी, २०२०
५) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सांकासं/१०३६, दिनांक २३ जुलै, २०२०

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ अन्वये महाराष्ट्र राज्यामध्ये एखाद्या क्षेत्रात उच्चतम कामगिरी करणाऱ्या व्यक्तीचा सन्मान करण्यासाठी महाराष्ट्र भूषण पुरस्कार देण्याची योजना सुरु करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र भूषण पुरस्कार हा राज्याचा सर्वोच्च नागरी सन्मान आहे. हा पुरस्कार कोणत्याही क्षेत्रात निरपेक्ष वृत्तीने सेवा करणाऱ्या तसेच त्याद्वारे मानवी जीवन उंचावण्यासाठी उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्तीला प्रदान करण्यात येतो. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील समिती सदर पुरस्कारार्थी यांची निवड करते. उपर्निर्दिष्ट क्र. ४ अन्वये सांस्कृतिक कार्य विभागांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या सर्व समित्यांवरील सर्व अशासकीय अध्यक्ष / कार्याध्यक्ष / सदस्य यांच्या नेमणुका रद्द करण्यात आलेल्या आहेत. त्याअनुषंगाने महाराष्ट्र भूषण पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र भूषण पुरस्कार निवड समितीच्या पुनर्रचनेस खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**अ) शासकीय सदस्य**

| | |
|---|---|
| १. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य | उपाध्यक्ष |
| ३. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | सदस्य |

४. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य — सदस्य
५. सचिव, सांस्कृतिक कार्य — सदस्य
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय — सदस्य सचिव

**ब) अशासकीय सदस्य**

१. डॉ. अनिल काकोडकर (शास्त्रज्ञ) — अशासकीय सदस्य
२. डॉ. प्रकाश आमटे (सामाजिक कार्य) — अशासकीय सदस्य
३. श्री. बाबा कल्याणी (उद्योग) — अशासकीय सदस्य
४. श्री. संदिप पाटील (क्रीडा) — अशासकीय सदस्य
५. श्री. दिलीप प्रभावळकर (कला) — अशासकीय सदस्य

सदर समिती या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील तीन वर्षे कालावधीसाठी किंवा समितीची पुनर्रचना होणे यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत कार्यरत असेल.

२. प्रवास व बैठक भत्ता :-

समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी व लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या प्रयोजनार्थचा खर्च हा मागणी क्र. झेडडी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५, १०२- कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०४) इतर महोत्सव, (०४) (०१) इतर महोत्सव (कार्यक्रम (२२०५ १६०५) - ५०, इतर खर्च या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०१००८११२०४५५४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2020.10.08 11:32:35 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१०.मा. निवड समिती अशासकीय सदस्य ( संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत )
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३.महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१५.महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८.निवड नस्ती, सां.का.४